**भ्रष्टाचार प्रतिबंध अधिनियम, १९८८ अंतर्गत**
**अभियोग दाखल करण्यास मंजुरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन परिपत्रक क्र. विचौअ-१६१९/ प्र.क्र. ४०/११-अ**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १४ जानेवारी, २०२१

<u>वाचा</u>:- १) शासन निर्णय क्रमांक: अभियो-१३१२/प्र.क्र. ३०/पुर्नबांधित-१/११-अ
दिनांक १२ फेब्रुवारी, २०१३.
२) शासन निर्णय क्रमांक: अभियो-१३१४/प्र.क्र. ८६/११अ
दिनांक ३१ जानेवारी, २०१५.

**<u>प्रस्तावना :-</u>**

लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडून भ्रष्टाचार प्रतिबंध अधिनियम, १९८८ खाली अभियोग दाखल करण्याचे प्रस्ताव सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पूर्वमंजुरीसाठी पाठविले जातात. सदर पूर्वमंजुरीकरिता प्राप्त होणाऱ्या प्रस्तावांवर करावयाच्या कार्यवाहीबाबत संदर्भाधीन शासन निर्णयांन्वये शासनाने वेळोवेळी सूचना दिलेल्या आहेत. सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मंजुरीने लोकसेवकांविरुद्ध अभियोग दाखल करण्यात येतो. तथापि, अभियोग मंजुरी आदेश सक्षम प्राधिकारी यांच्या स्वाक्षरीने प्राप्त न होणे, संबंधीत मा. मंत्री महोदयांची त्यास मान्यता घेतलेली नसणे, सक्षम प्राधिकारी यांनी अभियोगपूर्व मंजुरी आदेश निर्गमित करताना पुरेशी काळजी घेतलेली नसणे या कारणास्तव लोकसेवकास निर्दोष मुक्त केल्याची प्रकरणे घडत असल्याचे लाचलुचपत प्रतिबंधक विभागाने निदर्शनास आणले असून, या संदर्भात सक्षम प्राधिकारी यांना सूचना देण्यात याव्यात, असे प्रस्तावित केले आहे. त्या अनुषंगाने सक्षम प्राधिकारी यांना सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन परिपत्रक</u>** :-

१. महाराष्ट्र शासन कार्यनियमावलीतील नियम क्र.१३ मध्ये, राज्य शासनाच्या आदेशावर सचिव, सहसचिव, उप सचिव, अवर सचिव किंवा त्या बाबतीत ज्यास विशेष अधिकार प्रदान करण्यात आले आहेत, असा इतर अधिकारी यांनी सही केली पाहिजे; आणि अशी सही ही अशा आदेशाचे योग्य अभिप्रमाणन असल्याचे समजले जाईल अशी तरतुद आहे. सदर नियम भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद १६६ (Article १६६) व्दारा प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन तयार करण्यात आले आहेत.

२. भारतीय संविधानामधील अनुच्छेद १६६ (Article १६६) मधील ( Conduct of business of the Government of a State) कलमे खालीलप्रमाणे आहेत.

Clause (1) of the Article 166 requires that all executive action of a State Government shall be expressed to be taken in the name of the Governor.

Clause (2) of the Article 166 provides that orders and other instruments made and executed in the name of Governor shall be authenticated in such manner as may be specified in rules to be made by the Governor, and the validity of an order or instrument which is so authenticated shall not be called in question on the ground that it is not an order or instrument made or executed by the Governor.

Clause (3) of the Article empowers the Governor to make rules for more convenient transaction of the business of the Government of the State and for the allocation among Minister of the said business.

३. केंद्र शासनाच्या कार्मिक व प्रशिक्षण विभागाने विधि व न्याय मंत्रालयासमवेत सल्लामसलत करुन evidence of sanctioning/signing/authenticating authority या संदर्भात दि. १०/११/२००८अन्वये आदेश पारित केले आहेत. सदर आदेशातील महत्वाचा भाग (operative part) खालीलप्रमाणे आहे:-

The Hon'ble Supreme Court in the case of Md Iqbal Ahmed vs. State of AP 1979 Cr LJ 633 (SC) and in the case of State of Rajasthan Vs. Dr. A.K. Dutta AIR 1981 SC has held that the requirement of proving the sanction can be done in any two ways-either by producing the original sanction which itself contains the facts constituting the offence and the grounds of satisfaction or by adducing evidence aliunde to show that the facts were placed before the sanctioning authority and the satisfaction arrived at by it. In the case of CBI, Hyderabad vs. P. Muthuraman 1996 Cr LJ 3638, it was held that signature on the sanction should be proved either by the sanctioning authority or by his subordinate officer or clerk who has seen the sanctioning authority or who is acquainted with the signature of the sanctioning authority. Once the signature is proved and if the sanction order is a speaking order, then the matter ends there; otherwise evidence should be adduced to prove that the sanctioning authority had perused the material before according sanction which may not be in a particular form. In the case of Babarali Ahmedali Sayed V. State of Gujarat 1991 Cr LJ 1269 (Guj) it was held that if facts appear on the face of sanction then there is no question of proving it by leading evidence of authority who has accorded sanction to prosecute. No separate evidence is required to be led to show that relevant facts were placed before the authority. If the facts are not appearing on the face of the sanction, then it can be proved by independent evidence that sanction was accorded after those facts had been placed before the sanctioning authority.

In the case of State Vs K. Narsimhachary (2006 Cr LJ 518 SC), the Appex Court has held that the prosecution sanction order being a public document, there may not be a need to summon sanctioning authority as prosecution witness provided the prosecution proves that all the relevant material was placed before the sanctioning authority and the sanction was accorded thereafter. There are several other judgments of the Hon'ble Supreme Court and other High Court reiterating the above legal position.

Therefore, in the light of the catena of judgments on the subject, it is evident that if the sanction is accorded by the competent sanctioning authority and it contains the facts constituting the offence and the grounds of satisfaction, there is no requirement for the prosecution to summon the sanctioning/signing/authenticating authority for their personal evidence to prove the validity of the sanction. If at all necessary, the same can be corroborated by producing the original sanction and by examining the person conversant with the signature of the sanctioning authority/signing/authenticated authority. Accordingly there is no requirement for the prosecution to insist on personal evidence of sanctioning /signing/authenticated authority for proving the validity of the sanction as the same can be proved adequately otherwise.

However, if the prosecution sanction is challenged by the defence on the grounds of competence of the sanctioning authority or non-application of mind and if a prima-facie for doubting the validity of the sanction is made out by the accused , the trial court would be within

its powers under the provisions of section 311 of the Cr. P.C. to summon the sanctioning/ signing/authenticating authority.

All the concerned authorities/investing agencies may keep the above settled legal position in view of taking steps for proving the validity of the sanction and ensure that the sanctioning /signing/authenting authority may not be routinely included in the list of witnesses for the Prosecution.

४. भ्रष्टाचार प्रतिबंध अधिनियम, १९८८ अंतर्गत अभियोग दाखल करण्यासंदर्भात मंजुरी आदेशाबाबत सर्व प्रशासकीय विभागांना खालील प्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१) लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडून प्राप्त झालेले अभियोग मंजुरी मिळण्यासाठीचे प्रस्ताव, सक्षम प्राधिकारी यांच्यासमोर त्या प्रकरणात अभियोग दाखल करणे किंवा दाखल न करणे, या संदर्भातील उचित जाणीवपूर्वक निर्णयासाठी (Taking decision by application of mind) सादर करताना पुढील दोन बाबींवर सक्षम प्राधिकाऱ्याचे सुस्पष्ट आदेश मिळविण्यात यावेत.

i) अभियोग दाखल करणे किंवा दाखल न करणे या संदर्भात जाणीवपूर्वक निर्णय घेणे.

ii) अभियोग दाखल करावयाचा असल्यास अभियोग मंजुरी आदेशावर किमान उप सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यास स्वाक्षरी करण्यासाठी प्राधिकृत करणे (प्राधिकृत करावयाच्या अधिकाऱ्याचे नाव व पदनामासह)

२) वरील १) प्रमाणे दोन्ही प्रस्तावावर सक्षम प्राधिकाऱ्याची मंजुरी प्राप्त झाल्यावर सर्वप्रथम वरील अनुक्रमांक १ ii) प्रमाणे अधिकाऱ्यास अभियोग मंजुरीच्या आदेशावर स्वाक्षरी करण्यासाठी प्राधिकृत केल्याबाबतचे (अधिकाऱ्याचे नाव, पदनाम नमूद करुन) कार्यालयीन आदेश निर्गमित करण्यात यावेत.

३) वरील अनुक्रमांक २ प्रमाणे आदेश निर्गमित झाल्यावर, अभियोग मंजुरी आदेश प्राधिकृत अधिकाऱ्याच्या स्वाक्षरीने निर्गमित करण्यात यावेत व त्यात अभियोग मंजुरीचे आदेशावर स्वाक्षरी करण्यासाठी प्राधिकृत करण्यात आलेल्या आदेशाचा क्रमांक व दिनांक याचा उल्लेख करण्यात यावा.

५. वरील परिच्छेद ४ मधील सूचनांनुसार सर्व प्रशासकीय विभागांनी कार्यवाही करावी. तसेच लाचलुचपत प्रतिबंधक विभागाने या अनुषंगाने परि.३ मधील सूचना लक्षात घ्याव्यात. सदर सूचना सर्व प्रशासकीय विभागांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणाव्यात.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक संकेतांक २०२१०११४१५०२५२६७०७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rohini Bhalekar

Digitally signed by Rohini Bhalekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=440c600559857f4234e969f892346c88247ac81346a1b7229bf9917deb7bce48, serialNumber=1bb01c2624481a76c6d4667f2448f13830f94f775a478175d8f90da5b040bf94, cn=Rohini Bhalekar
Date: 2021.01.14 15:06:27 +05'30'

**(रोहिणी भालेकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,

२. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय मुंबई ४०००३२.

३. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई ४०००३२.
४. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव.
५. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव.
६. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव.
७. उपसभापती,महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव.
८. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव.
९. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव.
१०. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई ४०००३२.
११. मुख्य सचिव , महाराष्ट्र शासन.
१२. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय,मुंबई ४०००३२.
१३. महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१४. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा), मुंबई,
१५. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
१६. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१७. सचिव, महाराष्ट्र विधानसभा, विधान मंडळ सचिवालय, मुंबई.
१८. सचिव, महाराष्ट्र विधान परिषद, विधान मंडळ सचिवालय, मुंबई.
१९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
२०. आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, मुंबई
२१. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
२२. सर्व विभागीय आयुक्त, सर्व जिल्हाधिकारी, सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,
२३. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख,
२४. विधीमंडळ ग्रंथालय, विधान भवन, मुंबई.(१० प्रती),
२५. सर्व विधीमंडळ सदस्य.
२६. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.
२७. निवड नस्ती (कार्या.११-अ).